**<u>महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या मार्फत राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.</u>**
**महामंडळाच्या गोदामांच्या पायाभूत सुविधांमध्ये सुधारणा करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रक्रिया-१११८/प्र.क्र.५१/१-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दि. २९ जानेवारी, २०१९.

**<u>वाचा:-</u>**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २५ व्या बैठकीचे इतिवृत्त शासन पत्र क्र.RKV ०५१८/C.R.१६२/१४-A, दि.२७ ऑगस्ट, २०१८

**<u>प्रस्तावना : -</u>**

राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत केंद्र शासनाने प्रसिद्ध केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि.२० सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती (SLSC) गठीत करण्यात आलेली आहे. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २५ वी बैठक दि.२५ जुलै, २०१८ रोजी पार पडली. या बैठकीमध्ये महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने आदिवासी भागातील गोदामांचे उन्नतीकरण करण्याचा प्रस्ताव सादर केलेला होता. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ सन १९५७ पासून कृषिमालाच्या साठवणूकीसाठी गोदामे उभारणीचा कार्यक्रम राबवित आहे. आजतागायत महामंडळाने १७.२५ लक्ष मे.टन साठवणूक क्षमता निर्माण केलेली आहे. "महाराष्ट्रामध्ये एकूण १७ जिल्ह्यांमध्ये आदिवासी भाग विखुरलेला आहे. यामध्ये प्रामुख्याने धुळे, नंदुरबार, जळगाव, नाशिक, पालघर, ठाणे, चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा गोंदीया, नागपूर, अमरावती व यवतमाळ या जिल्ह्यांचा समावेश आहे."

आदिवासी भागातील गोदामाच्या सोयीसुविधा अद्यावत केल्याने त्याचा फायदा मुख्यत्वे शेतकऱ्यांना अन्नधान्य साठवणूकीस होणार आहे. यासाठी महामंडळाने सादर केलेल्या अहवालानुसार आदिवासी विभागातील गोदामांचे सिमेंटचे पत्रे काढून त्या जागी गॅलव्हॅल्यूम पत्रे बसविणे, गोदामाभोवती संरक्षण भिंत बांधणे, काही वखार संकुलातील रस्त्याचे कॉंक्रीटीकरण करणे व काही ठिकाणी ग्रील रोलींग शटर्स लावणे इत्यादी प्रकारच्या सोयीसुविधा उपलब्ध करुन गोदामांचे उन्नतीकरण करणे निकडीचे झाले आहे. अशा प्रकारच्या सोयीसुविधा निर्माण केल्याने गोदामांचा साठवणूकीसाठी वापर पूर्ण क्षमतेने शेतकऱ्यांसाठी करता येईल. त्यामुळे अशा वखार केंद्रावर ई-वखार पोती NCDEX इ.सुविधा उपलब्ध करुन देता येतील. ज्यायोगे शेतकऱ्यांसाठी कृषि माल तारण योजना उपलब्ध करुन देता येणे शक्य होईल. तत्कालीन उपलब्ध बांधकाम विषयक तंत्रज्ञानानुसार महामंडळाच्या गोदामांना सिमेंटचे पत्रे बसविलेले आहेत. मात्र, सिमेंटचे पत्रे हे ॲसबेस्टॉस (Asbestos) या खनिजापासून बनविलेले असतात. ॲसबेस्टॉसमुळे मनुष्याला फुफ्फुसाचा कर्करोग सारखा भयंकर आजार होत असल्याचे सिद्ध झाले आहे. त्यामुळे जगातील ५२ देशांमध्ये ॲसबेस्टॉसच्या वापरावर बंदी घालण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांमधील मानवाच्या खाद्यासाठीचे अन्नधान्य साठवणूक होत असून सदर गोदामांना ॲसबेस्टॉस (Asbestos) वापरलेले सिमेंटचे पत्रे असल्याने सदर साठवणूकीतील धान्याच्या वापराने फुफ्फुसाच्या कर्करोगासारखा भयंकर आजार राज्यातील मानवी समूहाला होण्याचा धोका संभवतो. राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाकडील दावा

क्र.६९३/३०/९७-९८ मध्ये - Replace all asbestos sheets roofing with roofing made up of some other material that would not be harmful to inmates. असे स्पष्ट करण्यात आले आहे.

तसेच वखार संकुलात मुरुम किंवा खडीचे कच्चे रस्ते असल्याने गोदामांमध्ये साठवणूक केलेल्या अन्नधान्यांच्या थप्प्यांवर मोठ्या प्रमाणात धूळ जमा होते. सदरची धूळ ही तागाच्या बारदान्यातून बऱ्याचशा प्रमाणात अन्नधान्यात मिसळली जाते. तसेच पावसाळी वातावरणात वखार संकुलातील रस्ते, रस्त्याचा पृष्ठभाग मानकांप्रमाणे नसल्यामुळे वाहतूक योग्य राहत नाहीत. त्यामुळे पावसाळी दिवसामध्ये शेतकरी, व्यापारी व साठवणूकदारांना गोदामात जागा शिल्लक असली, तरी त्याचा वापर करता येत नाही. वखार संकुलामधील रस्त्यांचे कॉंक्रीटीकरण करणे गरजेचे आहे. तसेच गोदामांच्या सुरक्षिततेसाठी सर्व बाजुंनी संरक्षकभिंत बांधणे गरजेचे आहे. दिवसेंदिवस तापमानामध्ये वाढ होत असल्याने जुन्या पद्धतीची व्हेन्टीलेशनची सुविधा सुधारण्यासाठी गोदामाच्या बाहेरील बाजूनी ग्रील रोलींग शटर्स लावल्यास हवा खेळती राहून अन्न धान्याची प्रतवारी चांगली राहते. तसेच, महामंडळाने माहूर येथील स्थानिक शेतकऱ्यांच्या गरजा लक्षात घेऊन ३१५० मे.टन क्षमतेचे अद्ययावत गोदाम, इमारत, कॉंक्रीट रस्ता, संरक्षणभिंतीसहीत प्रकल्प हाती घेण्याचे ठरविले आहे.

परंतु, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडील मर्यादीत उत्पन्नाचे स्त्रोत व उपलब्ध निधीचा विचार करता, आदिवासी भागात महाराष्ट्र राज्य वखार महामंडळास गोदामांचे उन्नतीकरणाचा एकत्रित कार्यक्रम राबविणे शक्य नसल्याची बाब विचारात घेऊन, राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वर्षासाठी, गोदामांच्या उन्नतीकरणाद्वारे (Up Gradation) आदिवासी भागातील महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांच्या सोयी सुविधा सुधारणा अंतर्गत माहूर येथे नविन अद्यावत गोदाम बांधणे, ॲसबेस्टॉस (Asbestos) वापरलेले सिमेंटचे पत्रे बदलून, टर्बो व्हेन्टीलेटर सहीत गॅलव्हॅल्युमचे (Galvalume) पत्रे बसविणे, ग्रील रोलींग शटर्स लावणे, सुरक्षा भिंत बांधणे तसेच अंतर्गत रस्त्यांचे कॉंक्रीटीकरण करणे व ॲप्रन गटर बांधणे या प्रकल्पासाठी एकूण रु.७३.०८ कोटी रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे. प्रकल्प खर्च रु.७३.०८ कोटी पैकी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ स्वनिधीतून रु.१८.०८ कोटी व राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून रु.५५.०० कोटी खर्च करण्यात येणार आहे. या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**१.** मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२५ जुलै, २०१८ रोजी संपन्न झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या २५ व्या बैठकीत सदरच्या प्रकल्पाबाबत महामंडळाने आदिवासी भागातील गोदामांच्या उन्नती करण्याच्या प्रस्तावाची फेर तपासणी सर्व बाजूंनी तपासणी करुन फेर प्रस्ताव SLPSC च्या अध्यक्षांकडे सादर करावा व सदरचा प्रस्ताव मंजूर करण्याचे अधिकार SLPSC च्या अध्यक्षांना प्रदान करुन मंजूरी देण्यात आली. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने गोदामाच्या उन्नतीकरणाच्या प्रकल्पाची तपासणी करुन फेर प्रस्ताव सादर केला आहे. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांच्या उन्नतीकरणाद्वारे (Up Gradation) आदिवासी भागातील महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांच्या सोयीसुविधा सुधारणा अंतर्गत माहूर येथे नविन अद्यावत गोदाम बांधणे, १० केंद्रावर ॲसबेस्टॉस (Asbestos) वापरलेले सिमेंटचे पत्रे बदलून, टर्बो व्हेन्टीलेटर सहीत गॅलव्हॅल्युमचे (Galvalume) पत्रे बसविणे, १० केंद्रावर ग्रील रोलींग शटर्स लावणे, २७ ठिकाणी सुरक्षा भिंत बांधणे तसेच ३४ केंद्रावर अंतर्गत रस्त्यांचे कॉंक्रीटीकरण

करणे व अॅप्रन गटर बांधणेसाठी एकूण रु.७३.०८ कोटींच्या प्रकल्पास राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत २०१८-१९ च्या आर्थिक वर्षात अंमलबजावणी करण्यास SLPSC च्या अध्यक्षांनी मान्यता दिलेली आहे. त्यामुळे सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान हे Integrated Scheme for Agricultural Marketing यांच्या खर्च निकषांनुसार राहील.

**२.** सदर कामांचा CSR/DSR नुसार अंदाजित खर्च व अनुदान यातील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ स्वत:च्या निधीतून भागवेल. सदर प्रकल्पाचा घटकनिहाय अनुदानाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| **अ. क्र.** | **पुरक (घटक)** | **एकूण रक्कम (रु. लाखात)** | **RKVY शेअर (रु. लाखात)** | **म.रा.व.म. शेअर (रु. लाखात)** |
|---|---|---|---|---|
| १. | माहूर येथे अद्ययावत ३१५० मे.टन क्षमतेच्या गोदामाची निर्मिती करणे. | ३१३ | २३५ | ७८ |
| २. | गोदामांचे सिमेंटचे पत्रे काढून नविन गॅलव्हॅल्युम शिट बसविणे.(१० केंद्रावर) | ६६५ | ४९९ | १६६ |
| ३. | गोदामांना ग्रील रोलींगशटर प्रदान करुन व्हेंटीलेशन सिस्टीमचे उन्नतीकरण करणे. (१० केंद्रावर) | ३५ | २६ | ९ |
| ४. | गोदामांच्या सुरक्षिततेससाठी संरक्षकभिंती उभारणे.(२७ केंद्रावर) | १७०४ | १२७८ | ४२६ |
| ५. | अॅप्रोन गटरसहीत रस्ते काँक्रीटीकरण करुन अद्ययावत करणे.(३४ केंद्रावर) | ४५१९ | ३३८९ | ११३० |
| ६. | प्रशासकीय खर्च. | ७२ | ७२ | ० |
| | **एकूण रक्कम** | **७३०८** | **५४९९** | **१८०९** |
| | **रु.कोटी** | **७३.०८ कोटी** | **५५.०० कोटी** | **१८.०८ कोटी** |

**३.** राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत मंजूर करण्यात आलेले अनुदान रु.५५.०० कोटी खर्च करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने सदर सर्व कामांचे नियमांनुसार खर्चाचे अंदाजपत्रके व नकाशे तयार करुन घेऊन नियमित पद्धतीनुसार कामांस प्रशासकीय मान्यता द्यावी.

२) सदर प्रकल्प/योजना राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ अंमलबजावणी यंत्रणा म्हणून काम पाहील. संबंधित यंत्रणांनी सदर प्रकल्प/योजना राबविताना त्याची अंमलबजावणी, संनियंत्रण आणि मूल्यमापन करणेबाबत आवश्यक तो समन्वय पणन विभाग,

मंत्रालय, मुंबई यांच्याशी ठेवावा. तसेच वेळोवेळी प्रकल्प अंमलबजावणी विषयक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल पणन विभाग, मंत्रालय, मुंबई यांस सादर करावा.

३) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाचे अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक यांनी समिती गठीत करुन, प्रकल्पांच्या आर्थिक व भौतिक उद्दीष्टांचा आढावा घ्यावा.

४) वरील प्रकल्प/योजनांची अंमलबजावणी संनियंत्रण व मूल्यमापन केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषांनुसार अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांनी करावे.

५) या प्रकल्पाकरिता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यांच्या स्वाक्षरीने कृषि विभागास सादर करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१५१४११८५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash Mansaramji Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperative Marketing, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ce079d77649e3080d74540a4a9ae7f6502ac7e6273891f24ffda6ebea493dce, serialNumber=d214bfebdf948d521ecc91e9cb1487d0cce508098bc2232154c36daba7635819, cn=Jaiprakash Mansaramji Ambade
Date: 2019.01.29 15:27:26 +05'30'

**( ज.म. अंबादे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्ष नेते विधानसभा व विधानपरिषद.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा. मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव.
५. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, ५८३/ब, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे-४०० ०३७.
६. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
१०. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. कक्ष अधिकारी, राकृवियो/६अे/७अे, कृषि व पदुम विभाग.
१२. निवडनस्ती (१-स).

****************************